**गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन शुद्धीपत्रक क्रमांकः आस्था-२०१४/प्र.क्र.९६/पापु-०१**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
तारीख: ०८ जुलै, २०२०.

**वाचा :**

१) **शासन निर्णय क्रमांकः** आस्था-२०१४/प्र.क्र.९६/पापु-०१, दिनांक २४ एप्रिल, २०१५.
२) **महाराष्ट्र जीवन प्राधिकरण अधिसूचना दिनांक ०४ जून, २०१४.**

**प्रस्तावना :**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्रमांक ८२/२०११ मध्ये दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१३ रोजी दिलेल्या निदेशास अनुसरून विभागातील गट-अ, गट-ब व गट-क मधील अधिकारी कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी संदर्भाधीन क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याच्या सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

तसेच संदर्भाधीन क्रमांक (२) येथील अधिसूचनेद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील अधिकाऱ्यांची/ कर्मचाऱ्यांची बदली करण्यास सक्षम असणारे प्राधिकारी विनिर्दिष्ट केले आहेत. त्यामुळे संदर्भाधीन विषयाबाबत दोन वेगवगळे शासन आदेश अंमलात आहेत.

वर नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन संदर्भाधीन क्रमांक (१) येथील शासन निर्णयास शुद्धीपत्रक पारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुद्धीपत्रक :**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन संदर्भाधीन क्रमांक (१) येथील शासन निर्णयातून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला वगळण्यात येत आहे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणासाठी स्थापन केलेले नागरी सेवा मंडळ (१) या शासन शुद्धीपत्रकानुसार रद्द करण्यात येत आहे.

वरील परिच्छेदात नमूद केलेले बदल हे केवळ महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास लागू असल्यामुळे संदर्भाधीन क्रमांक (१) मधील इतर तरतुदी कायम राहतील.

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या दिनांक ४ जून, २०१४ च्या अधिसूचनेनुसार विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील गट अ, गट ब व गट क मधील अधिकारी/कर्मचारी यांच्या पदस्थापना/बदल्या करण्यात याव्यात.

सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००७०८१३१३३१४४२८ असा आहे. हे शुद्धीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrakant Krishna More

Digitally signed by Chandrakant Krishna More
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=11ac200219edb36f7777ee1101657bea4271090267228122b638d6f2cdedad62, serialNumber=2314cf333e070f9936792bc95890fa89b2f617a931b2b577b703fa858f3df433, cn=Chandrakant Krishna More
Date: 2020.07.08 14:26:45 +05'30'

**(चं. कृ. मोरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, पा.पु.व स्व.वि, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव (सर्व), मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सह सचिव (कार्या-१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सह सचिव/ उप सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.
११.सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर, नरीमन पॉईंट, मुंबई.
१२.मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१३.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
१४.महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.
१५.महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
१६.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१७.अवर सचिव (सर्व), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. कक्ष अधिकारी (कार्यासन, पापु-२३), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. कार्यासन अधिकारी (सर्व), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिनस्त असलेली सर्व कार्यालये, कार्यालय प्रमुख, विभाग प्रमुख.

२१. संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

२२. निवडनस्ती, कार्यासन पापु-०१.